गडचिरोली जिल्हयात कोटगुल (ढोलडोंगरी) ता.कोरची येथे नवीन ३३ /११ के.व्ही. उपकेंद्र आदिवासी उपयोजनेतून उभारण्याकरिता येणाऱ्या खर्चास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन

## उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग

**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१९ /प्र.क्र.१२६ /ऊर्जा-५**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २३ मार्च, २०२३.

संदर्भ : १. शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-२०१९ /प्र.क्र.१२६ (१)/ऊर्जा-५/दि.१६.११.२०१९
२. महावितरण कंपनीचे पत्र क्र.मु.अ.(उविप्र)/आदिवासी उपयोजना/निधी मागणी/०१५२८/दि.१८.०१.२०२३.

**प्रस्तावना:**

गडचिरोली जिल्हयात कोटगुल (ढोलडोंगरी) ता.कोरची येथे नवीन ३३ /११ के.व्ही. उपकेंद्र आदिवासी उपयोजनेतून उभारण्याबाबत संदर्भिय शासन निर्णय क्र.(१) अन्वये मान्यता देण्यात आली आहे. सदर मान्यतेनुसार सदर कामास रु.८.१७ कोटी इतका निधी आवश्यक होता. यास अनुसरुन मागणी क्र.टी-५, लेखाशिर्ष -२८०१५०८९ अंतर्गत रु.६ कोटी निधी महावितरण कंपनीस आदिवासी विकास विभागामार्फत दि.२८.०९.२०२१ च्या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आला. सदर कामाची निविदा महावितरणने काढल्यानंतर १५ % अधिक दराने निविदा प्राप्त झाली तसेच प्रत्यक्ष सर्वेक्षणा दरम्यान जंगल व्याप्त क्षेत्रातून वाहिनी न उभारता जवळील मौजे टेमली व एडजल या गावांना जोडणाऱ्या रस्त्याच्या बाजूने वाहिनी घेतल्यामुळे वाहिनीची लांबी ९ कि.मी ने वाढली त्यामुळे मूळ खर्चात रु.८.१७ कोटी वरुन रु.१०.६६ कोटी इतकी वाढ झाली. सदर वाढीव खर्चास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. गडचिरोली जिल्हयातील कोटगुल (ढोलडोंगरी) ता. कोरची, येथे ३३/११ केव्ही, १x५ एमव्हीए क्षमतेचे नवीन वीज उपकेंद्र उभारण्याकरिता रुपये १०.६६ कोटी इतक्या खर्चास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च मंजूर व अर्थसंकल्पित केलेल्या तरतुदीनूसार पुढील लेखाशिर्षातून भागविण्यात यावा.

मागणी क्रमांक टी - ५

२८०१, वीज

८०, सर्वसाधारण, ७९६, जनजाती क्षेत्र योजना

(०२) जनजाती क्षेत्र उपयोजना,

(०१) (०३) महाराष्ट्र राज्य वीज वितरण (२८०१५०८९)
कंपनी मर्यादित यांना अनुदान
(राज्यस्तरीय योजना) (कार्यक्रम)
३५, भांडवली मत्तेच्या निर्मितीकरिता अनुदान

३. उपरोक्त निधी उपकेंद्र उभारणीच्या कामाच्या आवश्यकतेनुसार व निधीच्या उपलब्धतेच्या मर्यादेत टप्प्या टप्प्याने महावितरण कंपनीस आदिवासी विकास विभागाकडून देण्यात यावा.

४. हा शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग अनौ.संदर्भ क्र. ४९८, दिनांक ०१.०३.२०२३ अन्वये प्राप्त सहमतीच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०२३०३२३१९३६२१४२१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRASHANT PUNDLIK BADGERI

Digitally signed by PRASHANT PUNDLIK BADGERI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=07ae22a8e7fa4047ce6ff816d85e77eec14db9926b325a140acf9b28bb990786, pseudonym=AC7259A119539CB47009F7E30F693EAB895718AB, serialNumber=EC955E2D360E1FDDB6ABAC58A907419053BEECEB5DBAC48A78C89C588FF71BEF, cn=PRASHANT PUNDLIK BADGERI
Date: 2023.03.23 19:41:09 +05'30'

**( प्रशांत पुं. बडगेरी )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उपमुख्यमंत्री तथा मंत्री(ऊर्जा) यांचे खाजगी सचिव
४. मा. मंत्री, आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव
५. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा / विधान परिषद, विधानभवन, मुंबई.
६. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
७. अपर मुख्य सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. सर्व मंत्रालयीन विभाग
९. अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत वितरण कंपनी, प्रकाशगड, बांद्रा (पूर्व), मुंबई-५१.
१०. जिल्हाधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय, गडचिरोली
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई / महाराष्ट्र-२, नागपूर
१२. महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई

१३. कोषागार अधिकारी, जिल्हा गडचिरोली

१४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

१५. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई

१६. अवर सचिव (ऊर्जा-३), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

१७. कक्ष अधिकारी (व्यय-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

१८. कार्यासन अधिकारी (का-३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१९. निवड नस्ती (ऊर्जा-५), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.

२०. ऊर्जा विभागातील सर्व कार्यासने.